**महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता रु.२५६७.०० लाख इतक्या रकमेचा निधी वितरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बासप्र-०४१४/प्र.क्र.७२ /२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २४ डिसेंबर, २०१४

वाचा :-

१) **शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः बासप्र-२००८/प्र.क्र.४५/२१-स, दिनांक ९.५.२०११**

२) **प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प यांचा प्रस्ताव जा क्र.एमएसीपी-पीसीयु/लेखा/अनुदान मागणी १४-१५/१२२६/२०१४, दि.११.११.२०१४**

प्रस्तावना :-

जागतिक बँकेच्या सहकार्याने राज्यामध्ये महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प (MACP) राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पास उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. उपरोक्त संदर्भिय क्र. २ येथील प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता प्रकल्पांतर्गत विविध समाविष्ट घटकांसाठी रु. २५६७.०० लाख इतक्या रक्कमेचा निधी मंजुर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय:-**

सन २०१४-१५ करीता महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पांतर्गत सहभागी असणाऱ्या खालील नमूद यंत्रणांना एकुण रु.२५६७.०० लाख (रुपये पंचवीस कोटी सदुसष्ट लाख फक्त) इतक्या रक्कमेचा निधी मंजूर करण्यात येत असून सदर निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा-

| अ.क्र. | लेखाशिर्ष | मंजूर निधी (रुपये लाखात) |
|---|---|---|
| १ | मागणी क्र.व्ही-२<br>मुख्य लेखाशिर्ष २४३५-इतर कृषिविषयक कार्यक्रम<br>(०१), पणन आणि गुणवत्ता नियंत्रण<br>(१९९), इतर अशासकीय संस्थांना अर्थसहाय्य<br>राज्य योजनांतर्गत योजना<br>(०१) बाहय सहाय्यित प्रकल्प<br>(०१)(०१) जागतिक बँक सहाय्यित महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प<br>(राज्य योजना)(राज्य हिस्सा) (२४३५ ००१७)<br>३२, अंशदाने | २५०.००<br>(रुपये दोन कोटी पन्नास लाख फक्त) |
| २ | मागणी क्र.व्ही-२<br>मुख्य लेखाशिर्ष २४३५-इतर कृषिविषयक कार्यक्रम<br>(०१), पणन आणि गुणवत्ता नियंत्रण<br>(१९९), इतर अशासकीय संस्थांना अर्थसहाय्य<br>राज्य योजनांतर्गत योजना<br>(०१) बाहय सहाय्यित प्रकल्प<br>(०१)(०२) जागतिक बँक सहाय्यित महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प<br>(राज्य योजना)(बाहय हिस्सा) (२४३५ ००२६)<br>३२, अंशदाने | २३१७.००<br>(रुपये तेवीस कोटी सतरा लाख फक्त) |
| | **एकूण** | २५६७.००<br>**(रुपये पंचवीस कोटी सदुसष्ट लाख फक्त)** |

२. उपरोक्त परिच्छेद क्र.१ येथे नमूद लेखाशिर्षाखाली चालू वर्षी उपलब्ध असलेल्या तरतुदीतून मंजूर करण्यात आलेला रु.२५६७.०० लाख इतक्या रक्कमेचा निधी (रुपये पंचवीस कोटी सदुसष्ट लाख फक्त) महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पांतर्गत सहभागी विभागांच्या संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना पुढील तक्त्यातील विगतवारीनुसार उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | विभागाचे नाव | प्रकल्पांतर्गत अंमलबजावणी यंत्रणा | सन २०१४ -१५ करिता मंजूर निधी | नियंत्रण अधिकारी (क्ष) | आहरण व संवितरण अधिकारी (य) |
|---|---|---|---|---|---|
| | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| (अ) | **सहकार , पणन व वस्त्रोद्योग विभाग** | प्रकल्प समन्वय कक्ष (Project Co-ordination Unit) महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प, पुणे | १९९.५८ | श्री.रा.स.अटक उपसचिव,(पणन) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ | श्रीमती अ.अ.चुरी कार्यासन अधिकारी, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ०३२. |
| | | **एकुण(अ)** | **१९९.५८** | | |
| (ब) | | १) प्रकल्प अंमलबजावणी कक्ष (Project Implementation Unit), महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प, पुणे | ७८०.३९ | श्री.रा.स.अटक उपसचिव,(पणन) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ | श्रीमती अ.अ.चुरी कार्यासन अधिकारी , सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग , मंत्रालय, मुंबई -३२. |
| | | २)महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ , पुणे | ९९.९० | | |
| | | **एकूण (ब)** | **८८०.२९** | | |
| (क) | | १ जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था सर्व जिल्हे | ६०५.०६ | पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे | संबंधित जिल्हयांचे जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था/ सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था (सर्व जिल्हे) |
| | | **एकूण (क)** | **६०५.०६** | | |
| (ड) | कृषि विभाग | १)आत्मा | ६२६.६८ | संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक, लेखा-१, कृषी आयुक्तालय, पुणे |
| | | २) वनामती | २.९६ | | |
| | | ३)प्रकल्प अंमलबजावणी कक्ष - कृषि | २२३.५४ | | |
| | | **एकूण (ड)** | **८५३.१८** | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **(ई)** | पशुसंवर्धन विभाग | १)प्रकल्प अंमलबजावणी कक्ष-पशुसंवर्धन | ६.१५ | पशुसंवर्धन आयुक्त, पुणे | लेखा अधिकारी, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे |
| | | २ जिल्हा उपायुक्त, पशुसंवर्धन (सर्व जिल्हे) | २२.७४ | | जिल्हा उपायुक्त पशुसंवर्धन (सर्व जिल्हे) |
| | **एकूण (ई)** | | **२८.८९** | | |
| **एकूण (अ)+(ब)+(क)+(ड)+(ई)** | | | **२५६७.००** | | |

३. उपरोक्त परिच्छेद क्र.२ मधील "अ" येथील प्रकल्प अंमलबजावणी कक्ष (Project Implementation Unit) महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प, पुणे यांना लेखाशिर्ष २४३५ ००१७ या प्रकल्पाच्या बाहय हिश्श्यातून रु.२५० लाख निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. तसेच लेखाशिर्ष २४३५ ००२६ या प्रकल्पाच्या बाहय हिश्श्यातून उर्वरित सर्व यंत्रणांना रु.२३१७ लाख निधी वितरीत करावा. त्याबाबतची विगतवारी खालीलप्रमाणे आहे :-

१) प्रकल्प समन्वय कक्ष (Project Co-ordination Unit) - रु.१९९.५८ लाख
२) प्रकल्प अंमलबजावणी कक्ष (PIU) - रु.७८०.३९ लाख
३) महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे - रु.९९.९० लाख
४) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था(सर्व जिल्हे) - रु.६०५.०६ लाख
५) आत्मा, कृषि विभाग, पुणे - रु.६२६.६८ लाख
६) वनामती - रु.२.९६ लाख
७) प्रकल्प अंमलबजावणी कक्ष, कृषि विभाग - रु.२२३.५४ लाख
८) प्रकल्प अंमलबजावणी कक्ष, पशुसंवर्धन विभाग - रु.६.१५ लाख
९) जिल्हा उपायुक्त, पशुसंवर्धन (सर्व जिल्हे) - रु.२२.७४ लाख

४. परिच्छेद क्र.२ येथील तक्त्यातील "क्ष" आणि "य" मधील रकान्यात दर्शविलेल्या अधिकाऱ्यांना संबंधित विभागाकरीता अनुक्रमे "नियंत्रण अधिकारी" व "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये मंजूर एकूण रु.२५६७.०० लाख निधीपैकी श्री.रा.स.अटक, उपसचिव (पणन), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई -३२ यांना रु.१०७९.८७ लाख (रुपये दहा कोटी एकोणऐंशी लाख सत्याऐंशी हजार फक्त) तसेच पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना रु.६०५.०६ लाख (रुपये सहा कोटी पाच लाख सहा हजार फक्त) , संचालक, आत्मा, कृषि आयुक्तालय, पुणे यांना रु.८५३.१८ लाख (रुपये आठ कोटी त्रेपन्न लाख अठरा हजार फक्त ) आणि पशुसंवर्धन आयुक्त, पुणे यांना रु.२८.८९ (रुपये अठ्ठावीस लाख एकोणनव्वद हजार फक्त) निधी थेट अर्थसंकल्पीय प्रणालीव्दारे उपलब्ध करुन देण्यात येत असून त्यांनी सदर निधी परि.क्र.२ येथील तक्त्यामधील संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्दारे वितरीत करावयाचा आहे. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी सदर निधी परि.क्र.२ मधील स्तंभ क्र.३ येथील यंत्रणांना RTGS सुविधेव्दारे अदा करावेत.

५. महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प कार्यालयाच्या संदर्भाकित प्रस्तावाच्या अनुषंगाने अंमलबजावणी यंत्रणांनी प्रकल्पांतर्गत कामांकरीता मंजूर निधीच्या मर्यादेतच विनियोग करावा.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर निधीचा विनियोग प्रकल्पांतर्गत मंजूर घटकांच्या/उप-घटकांच्याच (Components/Sub-components) अंमलबजावणीकरीता तसेच मंजूर खर्च मर्यादेमध्येच प्रकल्पांतर्गत विहित पध्दतीनेच करण्यात येत असल्याबाबतची खात्री सर्व नियंत्रण अधिकाऱ्यांनी करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल व निधी उपयोगिता प्रमाणपत्र प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प यांना सादर करावे. सदर उपयोगिता प्रमाणपत्राच्या आधारे प्रकल्प संचालकांनी त्रैमासिक निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (IUFR) जागतिक बँकेस विहित कालावधीत सादर करुन सदर रकमेची प्रतिपूर्ती मिळविण्याकरीता वेळोवेळी पाठपुरावा करावा.

७. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प यांनी प्रकल्पामध्ये सहभागी असलेल्या सर्व विभागांच्या यंत्रणांमार्फत होणारा खर्च प्रकल्पांतर्गत समाविष्ट घटकांवर तसेच मंजूर खर्च मर्यादेमध्ये प्रकल्पांतर्गत विहित पध्दतीनेच खर्च होत असल्याबाबत खात्री करावी. त्याचप्रमाणे संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांनी तसेच प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प यांनी प्रकल्पांतर्गत मंजूर घटकांच्या/ उप-घटकांच्याच (Components/Sub-components) अंमलबजावणीमध्ये राज्य शासन जागतिक बँक व लाभार्थ्यांच्या खर्चाच्या विहित वाटयाचे काटेकोर पालन होईल याची खबरदारी घ्यावी.

८. या शासन निर्णयाच्या अनुषंगाने प्रकल्प संचालक (MACP), पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे व कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ यांनी आवश्यक त्या मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात.

९. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ अनौसं-५७६/१४/व्यय-२, दि.२२.१२. २०१४ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२२४१६५२५७०५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Baburao Tumbare

Digitally signed by Sunil Baburao Tumbare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Corporation marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Baburao Tumbare
Date: 2014.12.24 17:03:31 +05'30'

**( सु. बा. तुंबारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि व पणन/पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री (कृषि/पणन/पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (कृषि व पणन/ पशुसंवर्धन/वित्त/नियोजन), मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
५. आयुक्त (पशुसंवर्धन), पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे
७. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प, पुणे
८. महासंचालक, वनामती, धरमपेठ, नागपूर

९. पणन संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
११. विभागीय कृषि सहसंचालक
१२. जिल्हा उपनिबंधक , सहकारी संस्था,
१३. उप-आयुक्त, पशुसंवर्धन
१४. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी
१७. अवर सचिव/कक्ष अधिकारी (१७-स/रोखशाखा/२२-स),स.प.व व. विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१८.कक्ष अधिकारी (अर्थसं.१३/व्यय-२),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०. ०३२.
१९.निवडनस्ती (२१-स)